**परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत "नियोक्त्याच्या अंशदानात" वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अंनियो-३४१९/प्र.क्र.५५/टिएनटी ६**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०२ नोव्हेंबर, २०१९.

वाचा -

**१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो १००५/प्र.क्र.१२६/सेवा- ४, दिनांक ३१ ऑक्टोबर, २००५.**
**२) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः अंनियो १००६/(२३/६)/माशि २, दिनांक २९ नोव्हेंबर, २०१०**
**३) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः एसएसएन २०१२/(१५४/१२) /माशि २, दिनांक ५ फेब्रुवारी, २०१३**
**४) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-२०१२/प्र.क्र.९६/सेवा-४, दि.२७.०८.२०१४**
**५) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-२०१९/प्र.क्र.२६६/सेवा ४, दिनांक १९ ऑगस्ट, २०१९**
**६) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः अंनियो-३४१५/प्र.क्र.२७६/टिएनटी - ६ दिनांक १९ सप्टेंबर, २०१९**

प्रस्तावना :

दिनांक १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणा-या कर्मचा-यांसाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये अंमलात आली आहे. राज्यातील मान्यता प्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक /उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपद्धती संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये ठरविण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये जिल्हा परिषदेकडील शिक्षण विभागात शिक्षकांसाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आली आहे.

सदर योजना केंद्राच्या धर्तीवर राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णय अन्वये समाविष्ट केलेली आहे. त्याचप्रमाणे जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना लागू असलेली परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना (DCPS) केंद्राच्या राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत (NPS) समाविष्ट करुन योजनेबाबतच्या (स्तर१) अंमलबजावणीची कार्यपद्धती संदर्भाधीन क्र.६ अन्वये करण्यात आलेली आहे. परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत शासनाच्या अंशदानात वाढ करण्याबाबत संदर्भाधीन क्र.५ अन्वये शासकीय कर्मचाऱ्यांसाठी निर्णय घेण्यात आला आहे. सदर तरतूद राज्यातील मान्यता प्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक /उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील

शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी तसेच जिल्हा परिषदेकडील शिक्षण विभागातील शिक्षक व शिक्षकेत्तर पदावर काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्यातील मान्यता प्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक /उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावर दिनांक ०१.११.२००५ रोजी व त्यानंतर सेवेत नियुक्त झालेले शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी तसेच जिल्हा परिषदेतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत योजना लागू असलेल्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत "कर्मचाऱ्यांचे अंशदान" म्हणून वर्गणीदाराचे "मूळ वेतन अधिक महागाई भत्ता" या रक्कमेच्या १० टक्के इतके मासिक अंशदान कपात केले जाईल. तसेच सदर खात्यामध्ये यापुढे "नियोक्त्याचे अंशदान" म्हणून "वर्गणीदाराचे मूळ वेतन अधिक महागाई भत्ता" या रक्कमेच्या १४ टक्के इतके मासिक अंशदान देईल. नियोक्त्याच्या अंशदानामध्ये करण्यात आलेली वाढ दि.१ एप्रिल, २०१९ पासून देय राहील. माहे एप्रिल, २०१९ ते ऑक्टोबर, २०१९ च्या थकबाकी रक्कमेसह माहे नोव्हेंबर २०१९ च्या डिसेंबर, २०१९ मध्ये देय वेतन देयकाद्वारे वाढीव शासन अंशदान कपातीची कार्यवाही सुरु करण्यात यावी.

२. यासंबंधीचा खर्च नियोक्त्याचे अंशदान ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्या शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या-त्या शीर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. आवश्यक असल्यास संचालक (प्राथमिक) व संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी वरील खर्च भागविण्यासाठी विधिमंडळाच्या येत्या अधिवेशनात पूरक मागणी सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र.१५०/२०१९/सेवा-४, दिनांक १८ सप्टेंबर, २०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०२१५०७५०४३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARSHA MILIND KARANDIKAR

Digitally signed by VARSHA MILIND KARANDIKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=3f5189bc4e5751dd492acf5c90b732e1e04b7ae09704574983de5a9ea7bdbef5, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=1f6f75a359ad152edc7163322a272f034b3410680f731760fce9dad40de05c86, ou=SCHOOL EDUCATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VARSHA MILIND KARANDIKAR
Date: 2019.11.02 15:11:45 +05'30'

**( व.मि.करंदीकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
५) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई,
६) उपसंचालक, राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, नवीन प्रशासकीय भवन,५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई ३२,
७) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई
८) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण भवन, वाशी, नवी मुंबई,
९) उप-मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/औरंगाबाद /नाशिक /अमरावती
१०) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक
११) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१४) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष,
१५) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
१६) शिक्षण संचालक, (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१७) सर्व विभागीय उपसंचालक,
१८) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण),
१९) संचालक महानगरपालिका प्रशासन,मुंबई,
२०) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक,
२१) शिक्षण निरीक्षक, बृहनमुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,
२२) शिक्षणाधिकारी (सर्व)
२३) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परिक्षक (शिक्षण),
२४) शालेय शिक्षण विभागातील सर्व कार्यासने,
२५) निवडनस्ती, कार्यासन टिएनटि-६.